**कळंबोली, जि.रायगड येथे राज्य शिखर संस्थेची (State Apex Institute) (महाराष्ट्र-हब) इमारत विकसित करण्यासाठी शहर व औद्योगिक विकास महामंडळ (सिडको) तसेच पनवेल महानगरपालिका यांचेकडून आकारण्यात येणाऱ्या विविध शुल्क माफीबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग,**
**शासन निर्णय क्र. आयटीपी-२०२३/प्र.क्र.१९७/उद्योग-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २१ जून, २०२४

<u>वाचा</u> :- १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक मऔधो २०१९/ प्र.क्र.०६/ उद्योग-२, दिनांक ०७ मार्च, २०१९
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्रमांक आयटीपी २०२१/प्र.क्र१७०/उद्योग- २, दिनांक २७ जून, २०२३
३) मा.मंत्री (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झालेल्या दिनांक ३१/१०/२०२३ च्या बैठकीचे इतिवृत्त

**<u>प्रस्तावना</u>:-**

महाराष्ट्र राज्याचे औद्योगिक धोरण-२०१९ हे दिनांक ०७/०३/२०१९ रोजी घोषित झाले असून, सदर धोरणामधील परि.क्र.२२.१ मध्ये राज्यात जागतिक स्तरावरील (State of Art) उद्योजकता उत्तेजनासाठी शिखर उद्योजकता विकास संस्था (State Apex Institute) ही मुंबई महानगर क्षेत्रात कळंबोली (जि.रायगड) येथे महाराष्ट्र राज्य लघु उद्योग विकास महामंडळाच्या जागेवर स्थापन करण्याबाबत तरतूद करण्यात आली आहे. तसेच महाराष्ट्र राज्याचे नवीन माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण-२०२३ यांस मा.मंत्रीमंडळाच्या दि.३०.०५.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. सदर धोरण हे दिनांक २७.०६.२०२३ च्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आले. सदर धोरणामधील परि. क्र. १२.१ मध्ये राज्यातील अग्रगण्य तांत्रिक संस्था,बिझनेस स्कूल आणि खाजगी संस्था यांच्या सहकार्याने स्टार्टअपला सहकार्य करण्यासाठी "महाराष्ट्र हब" या राज्य शिखर संस्थेमध्ये उद्योग ४.० यासह अत्याधुनिक तंत्रज्ञानावर आधारित इनक्यूबेशन सेंटर आणि सेंटर ऑफ एक्सलन्स यांचाही समावेश करुन महाराष्ट्र हब हे कळंबोली, जिल्हा रायगड येथे महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळाच्या जमिनीवर विकसित करण्याबाबत तरतुद करण्यात आली आहे.राज्य शिखर संस्था (महाराष्ट्र-हब) ची उभारणी व व्हेंचर कॅपिटल फंड निर्मितीकरीता धोरण कालावधीत रूपये ५०० कोटी एवढा निधी वित्त विभागाशी सल्ला मसलत करून उपलब्ध करून देण्याची तरतूद करण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे नवीन माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण-२०२३ नुसार महाराष्ट्र लघू उद्योग विकास महामंडळाच्या कळंबोली,नवी मुंबई येथील भुखंड क्र.४८० येथे राज्य शिखर संस्था (State Apex Institute) (महाराष्ट्र-हब) विकसित करण्याच्या अनुषंगाने मा.मंत्री (उद्योग) यांच्यासमवेत झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार सदर इमारत विकसित करण्यासाठी सिडको तसेच पनवेल महानगरपालिका यांचेकडून आकारले जाणारे विविध शुल्क माफ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राज्य शिखर संस्था (State Apex Institute) (महाराष्ट्र-हब), कळंबोली, जि.रायगड हा राज्य शासनाचा एक महत्वाकांक्षी प्रकल्प असून, त्यामुळे राज्यात गुंतवणूक,रोजगार निर्मिती तसेच माहिती तंत्रज्ञान क्षेत्राचा विकास होण्यास हातभार लागणार आहे. हि बाब विचारात घेता, सदर इमारत विकसित

करण्यासाठी सिडको तसेच पनवेल महानगरपालिका यांचेकडून आकारले जाणारे पुढील शुल्क माफ करण्यात येत आहे :-

१. कळंबोली,जि.रायगड येथे राज्य शिखर संस्थेची (महाराष्ट्र-हब) उभारणी हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम १२९ (१) (अ) नुसार राज्य शासनाचा "विशेष प्रकल्प" म्हणून घोषित करण्यात येत आहे.
२. राज्य शिखर संस्थेची (महाराष्ट्र हब) ची इमारत विकसित करण्याच्या अनुषंगाने, शहर व औद्योगिक विकास महामंडळामार्फत (सिडको) जमीन वापरामधील बदलापोटी आकारण्यात येणारे शुल्क रू. ४५,०८,४४,४९४.३०/-,बांधकाम मुदतवाढकरीता आकारण्यात येणारे शुल्क रू. ५१,५७,४२०.३३/- सेवाशुल्कापोटी आकारण्यात येणारे शुल्क रू. २६,२२,५३०.००/- तसेच भूखंड हस्तांतरण आकारण्यात येणारे शुल्क रू. ४४,८१,६४०.००/- व थकीत भाडेपट्टा अधिमूल्य रुपये २,६३,२५,३५९/- असे एकूण अंदाजे रु.४८,९४,३१,४४४/- (रुपये अठ्ठेचाळीस कोटी चौऱ्याण्णव लक्ष एकतीस हजार चारशे चव्वेचाळीस फक्त) एवढे शुल्क लोकहितार्थ माफ करण्यात यावे.
३. सिडकोकडून भाडेकरार झालेल्या भूखंडाचा मूळ वापर "लोखंड व पोलाद गोदाम" प्रयोजनार्थ असा असून आता त्याचा वापर "माहिती तंत्रज्ञान धोरणातील अनुज्ञेय बाबी" प्रयोजनार्थ असा बदल विनामूल्य पध्दतीने करण्यात यावा.
४. सदर प्रकल्पासाठी बांधण्यात येणाऱ्या इमारतीचे नकाशे मंजूरीसाठी पनवेल महानगरपालिका यांचेकडून आकारण्यात येणारे विकास शुल्क, नागरी परिवहन प्रकल्प विकास शुल्क, तसेच अनुषंगिक शुल्क अंदाजे रूपये ४६,९३,२५,२३९/- (रुपये सेहेचाळीस कोटी त्र्याण्णव लक्ष पंचवीस हजार दोनशे एकोणचाळीस फक्त) एवढे माफ करण्यात येत आहे. तसेच प्रस्तुत "राज्य शिखर संस्थेस" जर भविष्यात अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक (एफएसआय) चा वापर करण्याची आवश्यकता भासल्यास त्यासाठी लागणारे अतिरिक्त शुल्क (प्रिमियम) देखील महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाला लागू होणार नाही.
५. सदर इमारतीकरीता पनवेल महानगरपालिकेमार्फत राज्य शिखर संस्थेचा वापर सुरु झाल्यानंतर १० वर्षांपर्यत रूपये १/- इतक्या नाममात्र दराने मालमत्ता कराची आकारणी करण्यात यावी.
६. सिडकोशी झालेला मूळ भाडेकरार सन १९८६ मध्ये झाला असून, त्याची मुदत ६० वर्षे आहे. यापैकी ३७ वर्षे पूर्ण झाली आहेत. त्यामुळे भाडेपट्टयाचा ६० वर्षाचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर पुढील ६० वर्षाकरीता भाडेकरार कालावधी वाढविण्यात यावा.

२. सदर शासन निर्णय मा.मंत्रीमंडळाच्या दिनांक १६/०३/२०२४ रोजी झालेल्या बैठकीतील मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संगणक संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०६२११३२७००६४१० असा आहे. हे शासन ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY SHAMKANT DEGAONKAR

Digitally signed by SANJAY SHAMKANT DEGAONKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=56CF8C8577584ADC42F070185C585C41084CC34F6683553D21CCACBFA33D4D1F, cn=SANJAY SHAMKANT DEGAONKAR
Date: 2024.06.21 15:37:05 +05'30'

**( संजय देगांवकर )**
**सह सचिव (उद्योग), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. मा.अध्यक्ष,विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
५. मा.सभापती,विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई.
६. मा.उपाध्यक्ष,विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७. मा.उपसभापती, विधान परिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
८. मा.विरोधी पक्षनेता,महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
९. मा.विरोधी पक्षनेता,महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग,मंत्रालय, मुंबई
१३. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
१५. प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी (पूर्व), मुंबई.
१८. पनवेल महानगरपालिका आयुक्त.
१९. व्यवस्थापकीय संचालक, सिडको, मुंबई.
२०. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२१. प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. सह सचिव (उद्योग-२) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३. निवड नस्ती (उद्योग-२)